G.R. 200408271530249001-0100. शासकीय सेवेत असताना दिवंगत, अकाली सेवानिवृत्त झालेल्या कर्मचा-यांच्या नातेवाईकांस अनुकंपा तत्वावर नियुक्ती देण्याबाबत.....

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय, क्रमांक: अकंपा-1095/प्र.क्र.34-अ/आठ,
मंत्रालय, मुंबई-400 032, दिनांक 23 ऑगस्ट, 1996.

**वाचा :-** (1) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: अकंपा-1092/1597/प्र.क्र.44/आठ, दिनांक 16 ऑक्टोबर, 1993.

(2) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: अकंपा-1092/2335/प्र.क्र.90/93/आठ, दिनांक 26 ऑक्टोबर, 1994.

## शासन निर्णय

शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: अकंपा-1093/2335/प्र.क्र.90/93/आठ, दि. 26 ऑक्टोबर, 1994 च्या शासन निर्णयानुसार अनुकंपा तत्वावर नियुक्तीची सुधारित योजना कार्यान्वित केली आहे. या योजनेमध्ये काही बदल करण्याबाबत विविध विभागांकडून आग्रह धरण्यात येत होता. त्यावर साकल्याने विचार करून सदर योजनेमध्ये पुढीलप्रमाणे बदल करण्यात येत आहेत :-

2. उपरोक्त शासन निर्णयातील परिशिष्ट 'अ' मधील -

(अ) नियम 2 (ब) नुसार गट 'क'/'ड' मधील कर्मचा-यांच्या बाबतीत, त्यांच्या वयास अनुक्रमे किमान 55 वर्षे / 57 वर्षे पूर्ण होण्यापूर्वी वैद्यकीय कारणास्तव सेवानिवृत्ति घ्यावी लागलेल्या कर्मचा-यांच्या नातेवाईकांसच या योजनेअंतर्गत लाभासाठी पात्र समजण्यात यावे.

(ब) नियम 3 (अ) नुसार अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र नातेवाईकांमध्ये पुढील नातेवाईकांचा समावेश करण्यात यावा.

(1) मृत शासकीय कर्मचा-याचा/वैद्यकीय कारणास्तव सेवानिवृत्त होणा-या शासकीय कर्मचा-यांचा मुलगा हयात नसेल व त्याच्या कुटुंबातील पात्र नातेवाईकांव्यतिरिक्त अन्य कोणीही अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र नसेल तर त्याची सून.

(2) केवळ अविवाहीत शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत त्यांच्यावर सर्वस्वी अवलंबून असणारा भाऊ किंवा अविवाहीत बहीण.

उपरोक्त योजनेंतर्गत नियुक्ती देण्यापूर्वी संबंधितांकडून कुटुंबातील अन्य व्यक्तींचा सांभाळ करण्याबाबत प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे.

3. ज्या शासकीय कर्मचा-यांना वैयक्तिक कायद्यानुसार एकापेक्षा जास्त लग्न करण्यास प्रतिबंध नसेल अशा कर्मचा-याच्या एकापेक्षा जास्त पत्नी हयात असल्यास, ज्या पत्नीला किंवा तिच्या मुलाला/अविवाहीत मुलीला अनुकंपा तत्वावर नियुक्ती द्यायची आहे त्या व्यतिरिक्त अन्य पत्नीचे ना-हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.

4. गट 'क' मधील पदांवर अनुकंपा तत्वावर नियुक्तीसाठी पात्र असणा-या कर्मचा-याला पदाच्या उपलब्धते अभावी गट 'ड' मधील पदांवर नियुक्ती दिल्यास पद उपलब्ध होताच गट 'क' मधील पदावर त्याला प्राधान्याने नियुक्ती देण्यात यावी. अशी नियुक्ती सरळसेवा नियुक्तीने भरण्यात येणा-या पदांवरील समजण्यात यावी. मात्र गट 'ड' मधील पदावर अनुकंपा योजनेअन्वये नियुक्ती देण्याच्या आदेशात तसा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा, तसे करण्यात आले असेल तरच गट 'क' मधील पदावर नियुक्ती देता येईल.

5. अनुकंपा तत्वावर लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या उमेदवारांना टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्यास 2 वर्षांची मुदत, पुढील अटींच्या अधिनस्त देण्यात यावी.

(अ) विहित कालावधीत हे प्रमाणपत्र सादर न केल्यास नियुक्ती संपुष्टात आणण्यात येईल, अशी अट नियुक्ती आदेशातच नमूद करण्यात यावी.

(ब) दिनांक 16 ऑक्टोबर, 1993 नंतर नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचा-यांनाच ही सवलत अनुज्ञेय राहील.

(क) दिनांक 16 ऑक्टोबर, 1993 च्या आदेशानुसार ज्या लिपिक-टंकलेखकांच्या नियुक्त्या 11 महिन्यात विहित टंकलेखन प्रमाणपत्र सादर न केल्याने संपुष्टात आणल्या गेल्या आहेत, त्यांनी आवश्यक प्रमाणपत्र प्राप्त केले असल्यास त्यांना पुन:नियुक्ती देण्यात यावी.

(ड) दिनांक 16 ऑक्टोबर, 1993 नंतर ज्या लिपिक-टंकलेखकांनी टंकलेखनाचे प्रमाणपत्र 11 महिन्यात प्राप्त केलेले नाही, तथापि, त्यांच्या नियुक्त्या पुढे चालू ठेवण्यात आलेल्या आहेत अशा कर्मचा-यांनी टंकलेखनाचे विहित वेगमर्यादेचे शासकीय वाणिज्य प्रमाणपत्र नियुक्तीच्या दिनांकापासून 2 वर्षांत प्राप्त करणे आवश्यक आहे. ज्यांच्या बाबतीत हा कालावधी यापूर्वीच संपुष्टात आला आहे त्यांच्या सेवा समाप्त करण्यात याव्यात.

(इ) कोणत्याही कारणास्तव दोन वर्षांपेक्षा अधिक मुदतवाढ अनुज्ञेय असणार नाही. हा कालावधी संपताच नियुक्ती संपुष्टात आणावी.

6. मृत/वैद्यकीय कारणास्तव अकाली सेवानिवृत्त होणा-या शासकीय कर्मचा-यांच्या नातेवाईकाला अनुकंपा तत्वावर नियुक्तीच्या योजनेची माहिती देण्याची जबाबदारी संबंधीत आस्थापना अधिका-यांची राहील. आस्थापना अधिका-याने अनुकंपा तत्वावर नियुक्तीच्या योजनेची माहिती शासकीय कर्मचा-याच्या मृत्यूनंतर 15 दिवसांनंतर किंवा कुटुंब निवृत्तिवेतनाची कागदपत्रे पाठविताना शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबियांना त्वरित उपलब्ध करून द्यावी. (सोबत नमुना माहितीसाठी).

7. यापूर्वीची प्रकरणे पूर्वीच्या नियमानुसार निकालात काढण्यात आली आहेत अशा प्रकरणांची पुन:तपासणी या आदेशानुसार करण्याची आवश्यकता नाही. तथापि, प्रलंबित प्रकरणे निकालात काढताना उपरोक्त तरतुदी विचारात घेऊन कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

य. मा. जोशी,
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-400 032,
मुख्य मंत्री यांचे सचिव,

एच-731(5000-8-96)-13.

सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोकआयुक्त व उप लोकआयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (10 जादा प्रतींसह),
* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-1 (लेखा व हक्कदारी), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-1 (लेखा परीक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-2 (लेखा व हक्कदारी), नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-2 (लेखा परीक्षा), नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक (निवासी लेखे), कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन 12, 13-अ व 14-अ,
सर्व मंत्रालयीन विभाग (सामान्य प्रशासन विभाग धरून),
निरनिराळ्या मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख.

# अनुकंपा तत्वावर नियुक्तीच्या योजनेची वैशिष्ट्ये

| | | | |
|---|---|---|---|
| 1. | उद्देश | :- | मृत शासकीय/वैद्यकीय कारणास्तव अकाली सेवानिवृत्त शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबियांना त्वरित आर्थिक आधार मिळणे. |
| 2. | पात्र नातेवाईक | :- | (अ) पती/पत्नी, मुलगा, अविवाहित मुलगी.<br>(ब) अविवाहित शासकीय कर्मचा-यांच्या बाबतीत सर्वस्वी अवलंबून असणारा अविवाहित भाऊ अथवा बहीण.<br>(क) मृत शासकीय कर्मचा-याचा मुलगा हयात नसेल तर त्याची सून. |
| 3. | अर्ज करण्याची मुदत | :- | मृत्युच्या/अकाली सेवानिवृत्तीच्या दिनांकापासून 5 वर्षे. |
| 4. | शैक्षणिक अर्हता | :- | (अ) त्या त्या पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार तथापि विधवेच्या बाबतीत गट 'ड' मधील नियुक्तीकरीता शिथिलक्षम.<br>(ब) लिपिक-टंकलेखक पदावरील नियुक्तीकरीता टंकलेखनाचे प्रमाणपत्र प्राप्त करून घेण्यास 2-वर्षांची सवलत. |
| 5. | अर्ज | :- | शक्यतो विहित प्रपत्रात करणे. |

उपरोक्त माहिती मिळाल्याबाबत कुटुंबियांकडून पोच घेणे आवश्यक आहे.